# कोण होती
# हॅरिएट टबमॅन?



# कोण होती
# हॅरिएट टबमॅन?

लेखन : योना ज़ेलडिस

मराठी अनुवाद : जयदीप कर्णिक



# अनुक्रमणिका

# कोण होती हॅरिएट टबमॅन?

हॅरिएट टबमॅनची नेमकी जन्मतारीख कुणालाच माहीत नाही. १८२० किंवा कदाचित १८२१ असावी. गुलाम मुलीची जन्मतारीख लक्षात ठेवावी असं कुणालाही तेव्हा वाटलं नसेल. गुलाम म्हणून जन्माला येऊनही हॅरिएट टबमॅन पुढे एक पराक्रमी आणि धाडसी युवती बनली. गुलामीतून स्वातंत्र्य मिळवणारी ती धैर्यवान स्त्री होती तसेच गुलामीतून सुटका करायला अनेकांना तिने मोठ्या धाडसाने मदत केली.



इतर गुलामांना पळून जाण्यासाठी आटोकाट प्रयत्न केल्याबद्दल तिला 'आपल्या माणसांची मोझेस' म्हटलं गेलं. बायबलमधील मोझेसप्रमाणे आपल्या माणसांनी स्वतंत्र असावं असं तिला मनापासून वाटत असे. आपलं आयुष्य अनेकदा पणाला लावून तिने कैक गुलामांना मुक्त व्हायला मदत केली. स्वतः उत्तरेला सुखरूप पोचल्यावरही इतरांना उत्तरेच्या गुलामगिरीमुक्त भूमीत आणण्यासाठी ती पुन्हा पुन्हा दक्षिणेत जात राहिली. अशा हॅरिएट टबमॅनची ही प्रेरणादायी गोष्ट आहे.



## प्रकरण १

## मेरीलँडमधील आयुष्य

१८२०च्या सुमारास मेरीलँडमध्ये हॅरिएट रॉस नावाच्या एका गुलाम स्त्रीला एक मुलगी झाली. हॅरिएटला, लोक ओल्ड रिट म्हणायचे. ती आणि तिचा नवरा बेन दोघांनाही लिहिता वाचता येत नसे. त्यामुळे मुलगी कधी जन्माला आली हे ते लिहून ठेऊ शकले नाहीत.



इतर कुणालाही त्याची गरज वाटली नाही. ओल्ड रिटचं तिच्या छोट्या बाळावर खूप प्रेम होतं. तिला ती मिंटी या टोपण नावाने हाक मारी. तिला आशा होती की मिंटी स्वयंपाक, शिवण-टिपण, विणणे अशी घरगुती कामं शिकेल. त्यामुळे तिची तंबाखू, मका किंवा गव्हाच्या शेतातल्या काबाडकष्टांपासून सुटका होईल.

ओल्ड रिट आणि बेन जन्मापासून गुलाम होते. त्यांना खूप मुलं होती आणि ती सगळी मुलं गुलाम होती. अमेरिकेत फार पूर्वीपासून काळे लोक गुलाम होते. १६२९पासून काळ्यांना आफ्रिकेतून अपहरण करून व्हर्जिनियात आणून गुलाम केले जाऊ लागले. तेव्हापासून गुलामीची ही रीत अमेरिकेच्या जगण्याचा अभिन्न हिस्सा बनली होती.



**गुलामांच्या जहाजाची दोन दृश्ये**

अठराव्या शतकाच्या पहिल्या दशकापासून बहुतांश उत्तरेच्या राज्यांनी गुलामीवर बंदी घातली होती. पण दक्षिणेत मात्र सारं काही पूर्वीप्रमाणे सुरु होतं.

बेन आणि ओल्ड रिट सारखे गुलाम अपार मेहनत घेत असत पण त्यांना त्याचा मोबदला मिळत नसे. बेन आणि ओल्ड रिटला मिस्टर ब्रोडस या त्यांच्या मालकाच्या जमिनीवर राहायला लागायचं. शेतं, जमीन आणि तिच्यावरील इमारतींसहितच्या आजूबाजूच्या परिसराला 'प्लांटेशन' म्हणत.



**प्लांटेशन हाउस**

दक्षिणेतील इतर अनेक गोऱ्यांप्रमाणे मिस्टर ब्रोडस यांचं प्लांटेशन हाउस सुद्धा भव्य दिव्य होतं. बेन आणि ओल्ड रिट यांच्या ते सतत नजरेस पडत असे. पण त्यांची राहण्याची जागा मात्र वेगळीच होती. इतर गुलामांप्रमाणे तेही शेतातल्या लॉग केबिनमध्ये (झोपडीत) रहायचे.



गुलामांच्या झोपड्या अगदी लहान असत. त्याला खिडक्या नसत. जमीन ओबडधोबड आणि अस्वच्छ असे. त्यावर फाटक्या तुटक्या गोधड्यांचा बिछाना अंथरला जाई. पण तरीही छोट्या मिंटीचं ह्या झोपडीवर प्रेम होतं.

चालायला यायला लागल्याबरोबर मिंटी आपले भाऊ बहीण आणि इतर गुलाम मुलांसोबत खेळू लागली. एखादा वयस्कर गुलाम ह्या सगळ्या मुलांकडे लक्ष ठेवत असे. अगदी छोटी मुलं उघडी नागडीच खेळत. थोड्या मोठ्या मुलांच्या अंगावर एखादा फाटका कपडा असायचा. तिथल्या एकाही मुलाजवळ बूट नव्हते. पण तरीही सगळे मजेत असायचे. उन्हाळ्यात तिथे स्वच्छ सूर्यप्रकाश आणि छान उबदार वातावरण असायचं. त्यावेळी ते नदी नाल्यात किवा तलावात पोहायचे, मासे पकडायचे.



गुलाम असली तरी मिंटी खुशीत असायची. आई-वडिलांवर तिचं मनापासून प्रेम होतं. तिचे बाबा तिला जंगल्यातल्या कितीतरी गोष्टी सांगायचे. त्यांना पक्ष्यांची चांगली ओळख होती. नुसतं बघून कुठली फळं चवीला मधुर असतील हे ते सांगू शकायचे.

# खरेदी आणि विक्री

*आफ्रिकेतून अमेरिकेत आणलेल्या गुलामांचा लिलाव केला जायचा. जो माणूस सगळ्यात मोठी बोली लावेल त्याला तो गुलाम विकला जायचा. पुरुष, बायका, मुलं यांचा बाजार मांडला जायचा. लिलावाची बातमी सगळ्यांपर्यंत पोचण्यासाठी वर्तमानपत्रात व्यवस्थित जाहिराती छापल्या जायच्या. गोरे लोक मोठ्या उत्साहाने गुलामांची तपासणी करायचे. बिनदिक्कतपणे गुलामांना तोंड उघडायला सांगून त्यांचे दात तपासायचे. गुलाम तगडा आहे की नाही हे बघण्यासाठी त्याचे दंड आणि पाय चांगले चाचपून बघायचे.*

*सगळ्यात वाईट हे होतं की लिलावानंतर बरेचदा कुटुंब तुटायचं. आईला मिसिसिपीतील मळ्याच्या मालकाला तर मुलांना लुईझियानातील मळ्याच्या मालकाला विकलं जाऊ शकायचं. नंतर त्यांना एकमेकांना कधीही भेटता यायचं नाही. अशाच प्रकारे नवरा - बायको, पालक - मुलं, भाऊ - बहिणी एकमेकांपासून क्रूरपणे तोडली जायची.*

*१८५९ला पियर्स एम. बटलर नावाच्या मळ्याच्या मालकाने कर्ज चुकते करण्यासाठी आपल्या चारशे छत्तीस गुलामांना विकलं होतं. तो अमेरिकेतला सगळ्यात मोठा अधिकृत लिलाव होता. त्याला 'विपिंग टाईम' म्हटलं जातं. बटलरच्या प्लांटेशनवरच्या गुलामांना जॉर्जियातील रेसट्रॅकवर आणलं गेलं . लिलावाची वाट पाहणाऱ्या ह्या गुलामांना घोड्यांच्या तबेल्यात ठेवलं गेलं. दोन दिवसांनंतर पूर्णपणे अनोळखी ठिकाणी त्यांना विकण्यात आलं. आपल्या कुटुंबियांना किंवा मित्रांना ते नंतर कधीही भेटू शकले नाहीत.*



मिंटीची आई तिला बायबलमधील गोष्टी सांगायची. आईकडून तिने मोझेसबद्दलही ऐकलं. हजारो वर्षांपूर्वी मोझेसने गुलाम असलेल्या आपल्या हिब्रू लोकांना इजिप्तमधून बाहेर काढून स्वातंत्र्य मिळवून दिलं होतं.

१८२६ च्या सुमारास मिंटी सहा वर्षांची झाली आणि तिच्या आयुष्यात मोठा बदल घडला. मिस्टर ब्रोडसनी तिला दुसऱ्या कुटुंबाकडे कामावर ठेवलं. म्हणजे तिला आता आपले आई बाबा आणि घर यांना सोडावं लागणार होतं. ज्यांची गुलाम विकत घेण्याची ऐपत नव्हती अशा गोऱ्या माणसांच्या घरी राहून आता तिला काम करावं लागणार होतं. एके दिवशी एक घोडागाडी आली आणि तिला आपल्या घरापासून दूर घेऊन गेली.

खरं तर मिंटीला घर सोडून जायची इच्छा नव्हती. तिच्या दोन मोठ्या बहिणींना आधीच कुणीतरी घेऊन गेलं होतं. त्या किती रडल्या होत्या हे तिला आठवत होतं. पण तरीही त्यांना जावं लागलं. मिंटीलाही जावं लागलंच.

मिंटी मिसेस कुक यांच्याकडे काम करायला गेली. मिसेस कुक विणकर होत्या. त्या दिवसभर मोठ्ठा आवाज असलेल्या यंत्रमागासमोर बसून काम करायच्या.





मिंटी त्यांना सुताची गुंडाळी करून द्यायला मदत करायची. तिथल्या हवेत मोठ्या प्रमाणात कापसाचे तंतू आणि कापडाचे सूक्ष्म धागे असायचे. एकदा त्यामुळे मिंटीला खोकला आला. खोकल्यामुळे तिच्या हातातले सूत खाली पडले. ती कामाकडे नीट लक्ष देऊ शकली नाही. मिसेस कुकला राग आला. तिला राग आला की ती मिंटीला चांगला चोप द्यायची. गुलामांना नेहमीच फटके मारले जायचे. गुलामांना वठणीवर आणण्याची गोऱ्यांची ती सर्वमान्य पद्धत होती.  मिसेस कुकनी आपल्या नवऱ्याला मिंटी मूर्ख आणि मंद आहे असं सांगितलं. त्यामुळे त्यांनी मिंटीला आपल्याबरोबर  कामाला घेतलं.

मिस्टर कुक छोट्या उंदरांसारख्या दिसणाऱ्या मस्करॅटना पकडण्याचा प्रयत्न करत होते. त्यांनी नदीकाठी सापळे लावले होते. मिंटीला त्याकडे लक्ष ठेवण्याचं काम करायला सांगितलं होतं. नदीकाठी कडाक्याची थंडी होती पण तिकडे शांतताही होती. हवा स्वच्छ आणि शुद्ध होती.

एके दिवशी सकाळीच मिंटी आजारी पडली. मिसेस कुकना वाटलं की ती काम चुकवण्यासाठी ढोंग करते आहे. म्हणून नेहमीप्रमाणे मिस्टर कुक यांनी तिला सापळ्यांवर लक्ष ठेवायला सांगितलं. तापात थंडीने कुडकुडत असताना ती नदीकाठी गेली.





ती जेव्हा परत आली तेव्हा तिला खरोखर बरं नाहीये हे मिसेस कुक यांच्या लक्षात आलं. त्यांनी तिला बरं होण्यासाठी तिच्या घरी पाठवून दिलं. ओल्ड रिटने सहा आठवडे मिंटीची सेवा केली, काळजी घेतली. पण जरा बरं वाटताच पुन्हा मिंटीला मिसेस कुक आणि यंत्रमागाकडे यावंच लागलं.  मिंटीला काही ते काम जमत नव्हतं. शेवटी वैतागून त्यांनी तिला परत घरी पाठवून दिलं.

त्यानंतर मिस्टर ब्रोडस यांनी तिला मिस सुझान यांच्या घरी कामावर ठेवलं. फक्त सात वर्षाच्या मिंटीला सुझान यांच्या बाळाची देखभाल करायची होती. बाळ रडलं तर मिंटीला फटके खायला लागायचे. रात्रभर बाळाच्या पाळण्यासमोर बसून हलकेच पाळणा हलवून मिंटी पार दमून जायची.

कधीतरी तिला अचानक झोप लागायची आणि बाळ रडू लागायचं. उठायला लागल्याने सुझानना खूप राग यायचा आणि मिंटीला पुन्हा फटके खायला लागायचे. सावध राहायला मिंटी शिकली होती पण तरीही इतक्या लहान वयात ते सोपं नव्हतं. ती अगदी थकून जायची.



एकदा सुझान यांची पाठ वळलेली असताना मिंटीने टेबलावरच्या वाटीतली साखर तोंडात टाकली.



आजवर तिने कधीच साखर चाखली नव्हती. गुलामांना क्वचितच गोडधोड खायला मिळायचं. तिला साखर खूप आवडली. पण सुझाननी तिला पाहिलंच. रागाने त्या चाबूक आणायला गेल्या.

मिंटी चपळ होती. ती दरवाजाबाहेर पळाली. जोपर्यंत सुझानने पाठलाग करणं थांबवलं नाही तोपर्यंत ती पळत राहिली. पण आता पुढे काय? आता जर ती परत गेली असती तर तिला बेदम मार खावा लागला असता.




मिंटीला एक डुकराचं खुराडं दिसलं. ती लपण्यासाठी त्या खुराड्यात घुसली. ती लहान असली तरी खूप शूर होती. सडलेले बटाटे आणि खरकटं अन्न खाण्यासाठी तिने डुकरांच्या पिलांशी झटापट सुद्धा केली. पण तेवढ्यात पिल्लांची आई आली आणि तिने तिला हुसकावून लावलं.

पाच दिवसानंतर मिंटी खूपच घाणेरडी आणि भुकेनी कासावीस झाली होती. मालकीणीकडे पुन्हा जायला लागणार हे तिला कळून चुकलं. नंतर मिंटीने सांगितलं, “जरी तिकडे जाऊन काय होणार हे माहित होतं तरी मी दुसरीकडे कुठे जाऊ शकणार होते?”



## *नॅट टर्नरचे बंड*

*सन १८००च्या सुमारास नॅट टर्नरचा जन्म झाला. तो साउथेम्प्टन काउंटी, व्हर्जीनिया येथील गुलाम होता. त्याच्या आईला बायबलमधील उतारे तोंडपाठ होते. ती ते त्याला शिकवायची. बायबलमधील मोझेसप्रमाणे तू एक दिवस नक्की आपल्या लोकांना स्वातंत्र्याचा मार्ग दाखवशील असं त्याला सांगत रहायची.*

*टर्नर मोठेपणी धर्मप्रचारक बनला. इतर गुलाम त्याला प्रेषित किंवा गुरु म्हणत असत. तो अबोल, भावनिक आणि एकलकोंडा माणूस होता. आपल्या माणसांना स्वतंत्र करण्यासाठी तुला देवाने निवडले आहे या आईच्या सांगण्यावर त्याचा विश्वास होता. १८२८ मध्ये त्याने जाहीर केले की कधी बंड करायचे याचा संकेत त्याला मिळणार आहे. २० ऑगस्ट १८३१ला सूर्यग्रहण होते. टर्नरला तो ईश्वरी संकेत वाटला. त्याच्या नेतृत्वाखालील गुलामांची टोळी मिळेल त्या गोऱ्या माणसाला मारत एका प्लांटेशनपासून दुसऱ्या प्लांटेशनकडे फिरत राहिली. ते जातील तिथे त्यांच्यात काळे गुलाम सामील होत गेले. सुमारे सत्तर गुलामांनी साठ गोऱ्या लोकांना ठार मारले. युनियनच्या सैनिकांच्या मदतीने शंभर काळ्यांना ठार मारून हे बंड मोडून काढण्यात आले. पण टर्नर मात्र तिथून सटकला आणि गुहेत जाऊन लपला. दोन महिन्यांनी तो सापडला . ११ नोव्हेंबर १८३१ला त्याला फाशी देण्यात आले.*





दुसऱ्या कुणाच्या घरी पाठवण्याऐवजी मिंटीला मिस्टर ब्रोडसनी आपल्या शेतावर कामाला पाठवलं. आता मिंटीला शेतातील कष्टाच्या कामाला जुंपण्यात आलं. तिला लाकूड फोडणं, ती लाकडं गाडीत भरणं, नांगर चालवणं आणि बैलांना हाकणं अशी मेहनतीची कामं करावी लागत. त्यामुळे आता ती मजबूत आणि कणखर बनली होती. ती आता कोणतेही काम करण्यासाठी तयार झाली होती. शेतात असताना ती आकाश बघू शकायची, अंगावर वारं घेऊ शकायची. काम करताना इतर गुलामांशी बोलू शकायची. त्यातूनच तिला नवनवीन विचार समजू लागले.




मुक्त होण्याची इच्छा असलेल्या गुलामांचे विचार तिने ऐकले. त्यातील काही गुलाम प्लांटेशनमधून पळाले. स्वातंत्र्य मिळवण्यासाठी ते उत्तरेकडे गेले. नॅट टर्नर सारख्यांनी गुलामीचा बिमोड करण्यासाठी बंड करायला सुरुवात केली.



नॅट टर्नर पकडला आणि मारला गेला. पण त्याचे विचार मेले नाहीत. अनेक गुलामांना आता स्वातंत्र्याची आस लागली होती. १८३४ मध्ये ब्रोडसचे गुलाम आणि दुसऱ्या एका प्लांटेशनमधील गुलाम मका कापायला एकत्र जमले. मक्याच्या सोनेरी कणसांतील हिरवी पिवळी पाती सोलताना ते गाणी गात होते. त्यांच्यातील एक गुलाम जरा वेगळा उभा होता. मिंटीचं त्याच्याकडे लक्ष गेलं. तो शेतातून हळूच सटकून पळू लागला. मुकादमाला आधी तर काही लक्षात आलं नाही. तो बराच पुढे गेला तेव्हा त्याच्याकडे त्या मुकादमाचं लक्ष गेलं. मुकादम जोरात ओरडला पण तो गुलाम पळतच राहिला.

आपला चाबूक हातात घेऊन तो मुकादम त्याच्या मागे धावत सुटला. मिंटीही त्यांच्या मागे निघाली. धावता धावता गुलाम एका दुकानात शिरला.






मुकादमही त्याच्या पाठोपाठ दुकानात शिरला. गुलाम पकडला गेला. मुकादमाने मिंटीला बोलावलं. पळणाऱ्या गुलामाला बांधण्यासाठी त्याला मिंटीची मदत हवी होती. पण मिंटी जागची हलली नाही. ती त्या दोघांना बघत उभी राहिली. अचानक त्या गुलामाने मुकादमाला धक्का दिला आणि तो दुकानाबाहेर पळाला.

मुकादमाला गुलामामागे धावता येऊ नये यासाठी मिंटी मुद्दाम दरवाज्यात उभी राहिली. मुकादमाने दोन पौंडांचं मोठं वजन उचललं आणि त्या गुलामाच्या दिशेने भिरकावलं. ते वजन गुलामाला न लागता नेमकं मिंटीच्या कपाळावर आदळलं.

मिंटीच्या कपाळातून रक्त वाहू लागलं आणि ती बेशुद्ध पडली. तिला ओल्ड रिटकडे आणण्यात आलं. ती जगेल असे कोणालाही वाटत नव्हतं. पण तरीही ओल्ड रिटने आपल्या मुलीची दिवस रात्र काळजी घेतली. शेवटी जखम बरी झाली पण तिच्या कपाळावर कायमची एक खुण राहिली.



त्या व्रणाने नव्हे तर तिच्या कर्तृत्वाने तिला बदलवलं होतं. लोक आता तिच्याकडे आदराने बघू लागले होते. फक्त तेरा - चौदा वर्षांची असूनही तिने मुकादमाला आव्हान दिलं होतं. आता तिला कोणी मिंटी म्हणत नव्हतं. सगळे तिला हॅरिएट या तिच्या आईच्या नावाने हाक मारू लागले. अर्थातच, आता ती लहान मुलगी राहिली नव्हती.



## प्रकरण २

## धृव ताऱ्याच्या शोधात

हॅरिएट बरी झाली असली तरी आता पूर्वीइतकी निरोगी राहिली नव्हती. तिचं प्रचंड डोकं दुखायचं. कधी कधी ती पूर्ण ग्लानीत असायची. एका क्षणी ती टक्क जागेपणी कुणाशीतरी बोलत असे तर दुसऱ्या क्षणी गाढ झोपलेली असे. स्वतःमधील ह्या बदलांनी हॅरिएट घाबरून गेली. इतक्यात तिच्या कानावर एक गोष्ट आली. तिचे मालक, मिस्टर ब्रोडस तिला आणि तिच्या काही भावांना विकायला निघाले होते.



आता काय होईल तिचं? चेन गॅंगबरोबर साखळीने बांधून तिला दक्षिणेकडे न्यू ऑरलियन्स, लुईझियाना, नॅचेज, मिसिसिपी असं कुठेही पाठवलं जाईल.

चेन गॅंगमध्ये गुलामांनी पळून जाऊ नये यासाठी सगळ्यांचे पाय एका साखळीने बांधलेले असत. दक्षिणेकडची ही यात्रा खूप दूरवरची आणि खडतर असे. चालता चालता हॅरिएटला मधेच झोप आली तर मुकादम तिला चाबकाने फटकारेल. कधी कधी तर तो तिला मरेस्तोवर चोप देईल. तिचे भाऊही तिच्या मदतीला येऊ शकणार नाहीत.

ह्या प्रवासात हॅरिएट जगली वाचली असती तरी दक्षिणेकडे जाणं ही मुळातच वाईट गोष्ट आहे हे हॅरिएटला ठाऊक होतं. तिकडे मोठ्या प्रमाणात कापसाची शेती केली जात असे.

.



# कापूस आणि तंबाखू

*दक्षिणेकडील शेतमळ्याचे मालक वेगवेगळी नगदी पिकं घेत असत. त्यातील कापूस आणि तंबाखू सगळ्यात जास्त लोकप्रिय होते.*

*कापसापासून कापड आणि कपडे बनवले जात. शेतमळ्याच्या मालकांना कापसाच्या लागवडीसाठी आणि कापूस वेचण्यासाठी मोठ्या प्रमाणात मजुरांची गरज लागत असे. आधी कापसाच्या शेतातून कापसाची बोंडं वेचायला लागायची. नंतर त्यातील सरकी आणि काडी कचरा काढून ती कातायला तयार करायला लागायची. ह्या काबाडकष्टाच्या कामाने गुलाम मजूर पुरता पिचून जायचा. कापसाप्रमाणे तंबाखूचीही मोठ्या प्रमाणात शेती केली जायची. तंबाखूची लागवड आणि त्याची पानं खुडणं ही कामंही मोठ्या प्रमाणात गुलामांकडून करून घेतली जायची.*

*गुलामांशिवाय ह्या नगदी पिकांची लागवड करणं आणि नफा मिळवणं शक्य नाही हे या शेतमळ्यांच्या मालकांना पक्क ठाऊक होतं. त्यामुळेच गुलामी सारख्या अमानुष प्रथेचं ते समर्थन करायचे. गुलाम आपलं रक्त आणि घाम शिंपून मालकांना वैभव मिळवून देत होते, हे त्यामागचं जळजळीत सत्य होतं.*



**कापसाचं रोप**



**तंबाखूचं रोप**

कापसाच्या शेतात काम करणं खूप कष्टाचं तर होतंच. पण दक्षिणेकडे आत आत जाणं म्हणजे उत्तरेपासून आणि स्वातंत्र्यापासून जास्त लांब जाणं झालं असतं. हॅरिएटला आयुष्यभर गुलाम बनून रहायचं नव्हतं. तिला काही करून लवकरात लवकर मुक्त व्हायचं होतं.

मिस्टर ब्रोडस मरावा म्हणून प्रार्थना करायला तिने सुरुवात केली. आश्चर्य म्हणजे खरोखरच काही दिवसांत तो आजारी पडला आणि मरण पावला. हॅरिएटला आपण असा विचार केला याची नंतर लाज वाटली.

तो मरावा म्हणून प्रार्थना करणं चुकीचं होतं असं पुढे हॅरिएटला नेहमीच वाटत राहिलं. पण तिचा नवीन मालक त्यामानाने बराच चांगला होता. त्याचं नाव डॉ. अँथनी थॉम्प्सन होतं. डॉ. थॉम्प्सनने हॅरिएट आणि तिच्या वडिलांना जॉन स्टुअर्ट नावाच्या बिल्डरकडे कामाला ठेवलं.

सुरुवातीला ती मिस्टर स्टुअर्टकडे धुणीभांडी, केर काढणे यासारखी घरगुती कामं करू लागली.



खरंतर हॅरिएटला अशी घरगुती कामं करणं अजिबात आवडत नव्हतं. तिने मिस्टर स्टुअर्टकडून पुरुषांबरोबर बाहेरची कामं करण्याची परवानगी मिळवली. तिने पुरुषांच्या बरोबरीने झाडं कापणं, लाकूड फोडणं अशी कामं करायला सुरवात केली. ती अतिशय कष्टाळू कामगार होती. काही वेळेस मिस्टर स्टुअर्ट तिला इतरांची कामं करायची परवानगी देत. त्यातून ती थोडे पैसेही मिळवे.



जरी त्यातले थोडे पैसे मिस्टर स्टुअर्टना द्यावे लागले तरी तीही थोडे पैसे साठवू लागली. पैसे मिळवण्यासाठी ती ओंडके वाहून नेणं, बैलगाडी चालवणं, शेत नांगरणं अशी जास्तीची कामं करत राहिली. त्या बिल्डरकडे हॅरिएटने पाच वर्षं काम केलं. त्यामुळे ती आणखी काटक आणि मजबूत झाली. आता ती साधारण एकवीस वर्षाची तरुण स्त्री झाली होती. काम करता करता वडील तिला अनेक गोष्टी शिकवत होते. अजिबात आवाज न करता जंगलात कसं वावरायचं हेही त्यांनी तिला शिकवलं.

आकाशात सप्तर्षी तसंच धृव तारा कसा शोधायचा हे त्यांनी हॅरिएटला शिकवलं. गुलामांसाठी धृव तारा जणू दीपस्तंभ होता. तो उत्तरेची, त्यांच्या मुक्तीची दिशा दाखवणारा तारा होता.



धृव ताऱ्यावर नजर ठेवली की आपण योग्य दिशेने चाललो आहोत हे आपल्याला समजत राहतं असं बेनने आपल्या मुलीला सांगितलं. पण आकाशात ढग असले आणि तारे दिसत नसले की काय करायचं?

बेनने हॅरिएटला सांगितलं की अशा वेळी झाडावरील शेवाळ्याला(मॉस) स्पर्श करायचा. झाडांच्या उत्तरेकडील बाजूवरच शेवाळं उगवतं. त्यामुळे ध्रुव ताऱ्याप्रमाणे शेवाळं ही आपल्याला मदत करू शकतं. हॅरिएट आपल्या वडिलांचं म्हणणं लक्षपूर्वक ऐकायची आणि लक्षातही ठेवायची. वेळप्रसंगी हे ज्ञान कामाला येईल याची तिला खात्री होती.



## प्रकरण ३

## एका मुक्त माणसाची पत्नी

१८४४ला म्हणजे तेवीस वर्षांची असतांना हॅरिएट जॉन टबमॅनच्या प्रेमात पडली. जॉनचे आई वडील गुलाम होते. पण त्यांच्या मालकाने मृत्युसमयी आपल्या सगळ्या गुलामांना मुक्त केलं होतं. त्यामुळे तो जन्मल्यापासून स्वतंत्र होता. जॉन आणि हॅरिएटने लग्न करायचं ठरवलं. हॅरिएटने हौसेने  एक गोधडी शिवायला सुरुवात केली.



कापडाचे छोटे छोटे तुकडे जोडून तिने गोधडी शिवायला घेतली. पण तिच्यासाठी शिवणकाम खूपच कठीण होत. तिला सुई नीट धरायची सवय नव्हती. सुई इतकी छोटी होती की सारखी तिच्या हातातून खाली पडायची. जमिनीवरच्या धुळीतून सुई शोधणं सोपं नव्हतं. तरीही चिकाटीने तिने गोधडी पूर्ण केली. गोधडीत पिवळा, जांभळा, पांढरा आणि हिरवा असे अनेक रंग होते. हॅरिएटसाठी ती जगातील सर्वात सुंदर वस्तू होती. तिच्या लग्नानंतर ती जेव्हा जॉनच्या झोपडीत गेली तेव्हा ती गोधडी तिने सोबत नेली.



जॉन खूप खुश होता. त्याचं हॅरिएटवर मनापासून प्रेम होतं. तिच्या मेहनतीच्या कमाईचं  त्याला कौतुक होतं. लवकरच त्यांनी स्वतःची झोपडी बांधली. सगळं छान चालू होतं. पण हॅरिएट मात्र संतुष्ट नव्हती. तिला सतत टोचणी असायची, जर तिच्या नवीन मालकाने तिला विकलं तर?



विक्रीनंतर हॅरिएटला जॉनपासून वेगळं व्हावं लागेल. त्यामुळे ती नेहमी सुटकेचा विचार करत असायची. तिने जॉनपाशी उत्तरेकडे जाऊया असा लकडा लावला. धृव  ताऱ्याच्या दिशेने आपण जाऊया. उत्तरेत पोचले की मी मुक्त होईन, आपण दोघेही मुक्त होऊ, असं स्वप्न ती त्याला दाखवत राहिली.

## ॲबॉलिशनिस्ट (गुलामगिरीचे निर्मूलक)

*गुलामगिरीला दुष्ट प्रथा मानून तिचे निर्मूलन करण्यासाठी झटणाऱ्या अठराव्या-एकोणिसाव्या शतकातील सुधारकांना ॲबॉलिशनिस्ट म्हणजेच गुलामगिरीचे निर्मूलक म्हणत. गुलामगिरीच्या विरोधात समाजात हळूहळू सुधारणा होत जाईल असे मानणाऱ्या सुधारकांपेक्षा ते जहाल आणि ताबडतोब क्रांती व्हायला हवी या विचारांचे असत. जरी गुलामगिरीला क्वेकर्सनीही विरोध केला असला ॲबॉलिशनिस्ट त्यांच्याहून वेगळे म्हणजे वेगवेगळ्या धर्मांना मानणारे असत.*

*विलियम विल्बरफोर्स आणि त्यांच्या अनुयायांनी आफ्रीकनांच्या गुलामगिरीविरुद्ध केलेल्या विरोधातून १७८०मध्ये इंग्लंडमध्ये ॲबॉलिशनिस्ट चळवळीची सुरुवात झाली. १८३१मध्ये अमेरिकेत विलियम लॉईड गॅरिसन यांनी बोस्टन येथे द लिबरेटर नावाचे गुलामगिरीविरुद्ध आवाज उठवणारे वृत्तपत्र सुरु केले. त्यातून अमेरिकत ॲबॉलिशनिस्ट चळवळीची सुरुवात झाली. इतर वृत्तपत्रे आणि प्रकाशक यांनीही त्यांना साथ दिली. १८६५च्या नागरी युद्धानंतर झालेल्या तेराव्या सुधारणेत गुलामगिरी कायद्याने हद्दपार करण्यात आली. विलियम गॅरिसन यांचा संघर्ष तोवर सुरूच होता.*



**विलियम लॉईड गॅरिसन**



जॉनला घर सोडून उत्तरेला जायची अजिबात इच्छा नव्हती. त्याला ते धोकादायक वाटत होतं. तिथे जाऊन खाणार काय? राहणार कसं? हे पळून जायचं स्वप्न विसर असं त्याने हॅरिएटला बजावून सांगितलं. ती त्याला पुन्हा पुन्हा मुक्त आयुष्य जगण्याच्या आपल्या स्वप्नाबद्दल सांगत राहिली. तू जर पळून जायचा प्रयत्न केलास तर मी मालकाला सांगीन असं जॉनने धमकावल्यापासून ती त्याला घाबरू लागली. तिच्या स्वप्नाशी जॉनला काही देणंघेणं नव्हतं. त्यामुळे जर मुक्त व्हायचं असेल तर तिला जॉनशिवाय एकटीला उत्तरेला जावं लागणार होतं.

एक दिवस हॅरिएट रस्त्याच्या कडेच्या एका शेतात काम करत होती. एका बग्गीत बसून एक गोरी बाई आली. तिने क्वेकर घालतात तसे साधे कपडे घातले होते. तिने हॅरिएटशी बोलायला सुरुवात केली. तिने हॅरिएटला नाव विचारलं आणि तिच्या कपाळावरच्या व्रणामागचं कारण विचारलं.



क्वेकर गुलामगिरीला विरोध करतात हे हॅरिएटला माहित होतं. त्यामुळे ह्या गोऱ्या बाईशी ती मोकळेपणाने, विश्वासाने बोलू लागली. ती बाई पुन्हा पुन्हा येत राहिली. कुणाचं लक्ष नाही ना हे पाहून त्या बोलत राहिल्या. तिला गरज असेल तेव्हा मदत करण्याचे त्या बाईने आश्वासन दिलं.

१८४९ मध्ये एक वाईट बातमी मळ्यात येऊन धडकली. हॅरिएट आणि तिच्या कुटुंबातील काही जणांना विकलं जाणार होतं. आपली विक्री! आता पळून जायलाच हवं. तिने भावांना सांगितलं. त्यांनी मिळून एक योजना आखली.

## क्वेकर्स

*जॉर्ज फॉक्स यांनी १६४८ मध्ये इंग्लंडला ख्रिश्चन धर्मात क्वेकर्स नावाने एक पंथ स्थापन केला. क्वेक म्हणजे कंप पावणे. आम्ही फक्त ईश्वराच्या शब्दाने कंपित होतो असे या नावातून फॉक्सना सुचवायचे होते. क्वेकर्स साधे कपडे वापरत, साधेपणाने राहत. त्यांना श्रीमंतीत रस नव्हता. ते युद्धाच्या, हिंसेच्या विरोधात होते. आजही या पंथाचे लोक जगात आहेत. ते त्यांच्या समाजमंदिरात धर्मगुरू किंवा पुजारी यांच्या मध्यस्थीशिवाय प्रार्थना करतात. तिथे क्वेकर समाजाच्या प्रत्येक सभासदाला आपलं मत व्यक्त करता येतं.*

*समानता हा क्वेकर विचारसरणीचा गाभा आहे. त्यामुळेच त्यांचा गुलामीला कडाडून विरोध होता. एकोणिसाव्या शतकापर्यंत क्वेकर्सपैकी अनेक जण ॲबॉलिशनिस्ट चळवळीचेही कार्यकर्ते बनले होते.* स्वतःचे जीव धोक्यात घालून *ते गुलामांना पळून जायला मदत करत. त्यांची घरं, दुकानं, गोठे, शेतं म्हणजे या गुलामांच्या सुटकेच्या मार्गातील म्हणजे भूमिगत रेल्वेवरील घटकाभर विश्रांतीसाठीची 'स्टेशन्स' होती.*



**जॉर्ज फॉक्स**



पण त्यांनी तिला जाऊ दिलं नाही. तिने त्यांना विरोध करायचा प्रयत्न केला. पण ते तिच्यापेक्षा मोठे आणि ताकदवान होते. त्यांनी तिला जबरदस्तीने परत आणलं.

दोन दिवसांनी गुलामांचा व्यापारी हॅरिएट आणि तिच्या भावांना घ्यायला येणार होता. तिला विचार करायला फार वेळ नव्हता. तिच्यापुढे मोठा कठीण प्रश्न होता. ती थांबली असती तर तिला चेन गॅंगसोबत जावं लागलं असतं. दक्षिणेत लांबवर जाताना कदाचित तिचा मृत्यूही झाला असता. पण सुटका तरी कशी करून घ्यायची? तिचा नवरा, जॉन, किंवा तिचे भाऊ कोणाचाही तिला पाठींबा नव्हता.

त्या रात्री जॉन झोपेपर्यंत हॅरिएट वाट बघत राहिली. तो झोपल्यावर ती तिच्या भावांकडे गेली. सुटकेच्या उद्देशाने ते जंगलात शिरले. पण जंगलातून चालताना तिचे भाऊ किती गडबड करत होते! आपल्याच आवाजाने सगळे घाबरले. सुटकेची ही योजना त्यांना खूप धोकादायक वाटत होती. परत फिरावं असं तिच्या भावांनी ठरवलं. हॅरिएटनेही आपलं ऐकलंच पाहिजे असं त्यांनी तिला बजावलं. ती तयार नव्हती. तिने एकटीने पुढे जायचा निर्धार केला.





म्हणून तिने एकटीनेच पळून जायचं ठरवलं. नेहमीप्रमाणे ती झोपायला गेली. जॉन गाढ झोपल्यावर ती उठली. फारसं काही सामान नव्हतंच. तिने एका गाठोड्यात डुकराचं मांस आणि मक्याची भाकरी बांधून घेतली. आपली गोधडीही सोबत घेतली आणि ती घरातून हळूच सटकली.

अखेर हॅरिएटची उत्तरेकडे म्हणजेच मुक्तीच्या दिशेकडे वाटचाल सुरु झाली. आपलं स्वप्न सत्यात उतरवायला ती आता निघाली होती.



## प्रकरण ४
## मोकळा श्वास

हॅरिएट घनदाट जंगलातून अजिबात आवाज न करता चालत राहिली. वडिलांच्या शिकवणुकीचा तिला आता फायदा होत होता. पाण्यात रानकुत्र्यांना आपला वास येत नाही हेही वडिलांनी तिला शिकवलं होतं. त्यामुळे शक्य होईल तेव्हा ती झरे आणि नदीनाल्यांच्या प्रवाहातून चालत राहिली. एकदाची ती त्या क्वेकर बाईच्या घरी पोचली. त्या बाईने तिचं स्वागत केलं, धीर दिला. पण जास्त वेळ थांबणं धोक्याचं असल्यामुळे त्या रात्रीच हॅरिएट तिथून निघाली.

पुढे काय करता येईल, उत्तरेकडे कसं जाता येईल ते क्वेकर बाईने तिला समजावून सांगितलं. हॅरिएटला तिचे आभार कसे मानायचे हे कळत नव्हतं. निरोप घेताना तिने आपली आवडती गोधडी त्या बाईला दिली.



हॅरिएटला अजून खूप लांब जायचं होतं. आधी मेरीलँडमधील चॉपटँक नदीपात्राच्या कडेने ती चालत राहिली. पहाट झाली की लपून बसायचं, काळोख झाला की पुन्हा चालायला लागायचं असा तिचा दिनक्रम होता. नदी चाळीस मैल पसरली होती. ही तर तिच्या प्रवासाची केवळ सुरुवात होती. हॅरिएट सावधपणे चालतच राहिली. नदी संपली तसा तिने कॅम्डेन, डेलावेरचा रस्ता धरला. पांढऱ्या रंगाचं हिरवी दारं-खिडक्या असलेलं घर ती शोधत होती. क्वेकर बाईनेच तिला तसं सांगितलं होतं. पांढऱ्या घरातील बाईचं नाव एलिझा हुन होतं. तिने हॅरिएटला तीन दिवस आश्रय दिला. तिने तिला नवीन कपडे आणि पुढच्या प्रवासासाठी जेवणही दिलं. हॅरिएटने पुन्हा आपला प्रवास सुरु केला.

हॅरिएट भूमिगत रेल्वेची एक प्रवासी बनली. या 'भूमिगत लोहमार्गावर' रूळ, डब्बे नव्हते पण 'थांबे' मात्र होती. क्वेकर्स किंवा अॅबॉलिशनिस्ट यांची घरं म्हणजेच ह्या पळून जाणाऱ्या गुलामांसाठीची आश्रय स्थानं किंवा 'थांबे'. गोऱ्या मालकांना चकवण्यासाठी भूमिगत रेल्वेचे प्रवासी अनेक सांकेतिक शब्द वापरत. पळून जाणाऱ्या गुलामांना 'बंडल्स', 'पार्सल्स' किंवा 'पॅकेजेस' म्हटलं जायचं. 'कापसाची एक गासडी' म्हणजे एक गुलाम. 'दोन छोटी गासडी' म्हणजे गुलामांची दोन छोटी मुलं.





पेन्सिल्वेनिया एक स्वतंत्र राज्य होते.
आता हॅरिएट एक स्वतंत्र स्त्री होती.
पुढे कधीतरी हॅरिएटने त्यावेळी तिला कसं वाटलं ते सांगितलं. “खरोखर स्वतंत्र झाले आहे ना याची खात्री करण्यासाठी मी माझ्या हातांकडे पाहिलं. मी आधीचीच व्यक्ती आहे की नव्याने जन्मले आहे? आजूबाजूचं सगळं काही आल्हाददायक दिसत होतं. झाडामागून सूर्य जणू काही सोनं उधळत शेतात आला होता. मला तर मी स्वर्गातच आहे असं वाटत होतं.”



गुलामांचे शिकारी जागोजागी टपून बसलेले असत. पळून जाणाऱ्या गुलामांना पकडणाऱ्या ह्या शिकाऱ्यांना मोठे बक्षीस मिळत असे. आपला मालकही आपल्याला शोधत असणार हे हॅरिएटला माहित होते. कपाळावरची खुण लपवण्यासाठी ती डोक्याभोवती ओढणी गुंडाळून घेत असे. कधी ती पुरुषासारखा तर कधी एखाद्या आधुनिक स्त्रीसारखा वेश करायची. ह्या कपड्यात तिला जास्त सुरक्षित वाटायचं. एकदाची ती पेन्सिल्वेनियाला पोचली.



पण या स्वातंत्र्याबरोबरच आव्हानंही होतीच. अनेक वर्षांनंतर हॅरिएटने सांगितलं, “मी मुक्त झाले होते, पण ह्या स्वतंत्र राज्यात माझं कुणीही नव्हतं. मी एका अनोळखी जगामधली एक अनोळखी व्यक्ती होते.” खरंच होतं ते. तिचं घर, कुटुंब, मित्र मैत्रिणी सगळे लांब मेरीलँडलाच राहिले होते. त्यांना इकडे आणायला ती लवकरच तिकडे जाणार होती.




फिलाडेल्फियामधील एका हॉटेलात जेवण बनवण्याचं आणि साफसफाईचं काम तिला मिळालं. ते काम तिला काही फारसं आवडलं नव्हतं, पण गुलाम असण्यापेक्षा ते कितीतरी बरं होतं. तिने कमावलेले सगळे पैसे तिचे स्वतःचे होते. तिला अगदीच कंटाळा आला तर ती ते काम सोडूही शकणार होती. आता तिच्यावर कोणी हुकुमत गाजवणार नव्हतं.

## दक्षता समित्या

*जसजसे गुलाम दक्षिणेकडून आपली सुटका करून येऊ लागले तसतश्या उत्तरेतील न्युयॉर्क, फिलाडेल्फिया, बोस्टनसारख्या मोठ्या शहरात दक्षता समित्या स्थापन होऊ लागल्या. इतर अनेक दक्षता समित्यांप्रमाणे विलियम स्टिल काम करत असलेली समितीही ह्या पळून येणाऱ्या गुलामांना आर्थिक मदत करण्यासाठी पैसे जमा करत असे. फाटक्या तुटक्या कपड्यात, अनवाणी पायांनी शहरात आलेल्या आणि कुठेही आसरा नसलेल्या ह्या निराश्रित गुलामांना ते अन्न, वस्त्र, निवारा आणि थोड्या पैशांची मदत करत. त्यांना काम मिळण्यासाठी दक्षता समिती त्यांना शिफारसपत्रेही देत असे.*



**विलियम स्टिल**

काम झाल्यावर हॅरिएट फिलाडेल्फियातील दक्षता समित्यांना भेट देत असे. पळून आलेल्या गुलामांना मदत करण्यासाठी ह्या समित्यांमधील लोक काम करत. त्या लोकांपैकी एखाद्याकडे कधीकधी हॅरिएटच्या कुटुंबाविषयी काही माहिती असे. त्यांच्याकडूनच एकदा हॅरिएटला कळलं की तिची बहीण मेरी आणि तिचं कुटुंब विकलं जाणार आहे.

हॅरिएटने ठरवलं की आपण मेरीलँडला जायचं आणि त्यांना इकडे उत्तरेला घेऊन यायचं. आपल्या बहिणीच्या कुटुंबाला आपली गरज आहे. दक्षता समितीचा सचिव विलियम स्टिल हॅरिएटचा मित्र झाला होता. असा धोका तिने पत्करू नये, पुन्हा दक्षिणेकडे जाऊ नये असं त्याने परोपरीने सांगितलं. पण तिने ऐकलं नाही.

मग एक चतुर योजना बनवली गेली. हॅरिएटच्या क्वेकर मित्रांनी ती योजना मेरीचा नवरा जॉन बॉले याला सांगितली. जॉन एक मुक्त माणूस होता. त्याची बायको आणि मुलं मात्र गुलामच होती.

ही योजना जॉनला कळेपर्यंत त्याचे कुटुंबीय गुलामांच्या लिलावाच्या ठिकाणी आणले गेलं होतं. पण ते अजून विकले गेले नव्हते.

लिलाव करणाऱ्या अधिकाऱ्याची जेवायची सुट्टी झाली होती. जेऊन झाल्यावर तो उरलेल्या गुलामांना विकणार होता.




तेवढ्यात जॉन बॉले लिलाव करण्याच्या ठिकाणी पोचला. त्याच्या हातात एक सफेद लिफाफा होता. गुलामांवर लक्ष ठेवणाऱ्या सुरक्षा रक्षकाकडे त्याने तो लिफाफा दिला. मेरीच्या मालकाला तिच्यासाठी आणि तिच्या मुलांसाठी दुसरा मालक मिळाला आहे असं त्यात लिहिलं होतं. मी त्यांना घेऊन जेवत असलेल्या लिलाव अधिकाऱ्याकडे जातो असे जॉनने त्या सुरक्षा रक्षकाला सांगितले.



ती एक युक्ती होती. ते पत्र खोटं होतं. पण सुरक्षा रक्षकाला काहीच संशय आला नाही. जॉन मेरी आणि मुलांना घेऊन निघाला. ते रस्त्यावर आले. पण ते अधिकाऱ्याला भेटायला गेलेच नाहीत.

ते चक्क दिवसाढवळ्या हातावर तुरी देऊन निसटले.

कुणालाही शंका येऊ नये म्हणून ते अगदी शांतपणे चालत होते.



खूप लांबचं वाटणारं अंतर कापून ते एका बंदिस्त कुंपण असलेल्या घरात शिरले. आत एक क्वेकर माणूस त्यांची वाट पाहत होता. ते पत्रं ह्या माणसानेच लिहिलं होतं. तो त्यांना घराच्या पोटमाळ्यावर घेऊन गेला.



रात्र झाली. मेरी आणि तिचा परिवार घोडागाडीत बसले. क्वेकरने त्यांना ब्लँकेटखाली लपवून नदीकिनारी आणले. खाण्याच्या वस्तू आणि उबदार पांघरूणं असलेली एक मच्छिमारीची होडी तिथे त्यांची वाट बघत होती. जॉन होडी वल्हवत मेरीलँडमधील चेसापिक नदीपर्यंत गेला. त्याला बाल्टिमोरच्या दिशेने यायला सागितले गेले. निळा आणि पिवळा अशा दोन दिव्यांकडे लक्ष ठेवायला त्याला सांगण्यात आलं होतं. जॉन रात्रभर होडी वल्हवत राहिला. सकाळ झाली तशी त्याला काळजी वाटू लागली. दिवसाच्या उजेडात त्याला दिवे कसे दिसणार? तरीही बारकाईने लक्ष ठेवत तो होडी वल्हवत राहिला.

किनाऱ्यावर एका बग्गीत एक गोरी बाई त्यांची वाट पाहत होती.



“तुम्ही कोण आहात?” तिने विचारलं.

“मित्रांसोबतचा मित्र.” जॉनने उत्तर दिलं. हा त्यांनी ठरवलेला सांकेतिक शब्द होता.



त्या बाईने मोठ्या आनंदाने त्यांचं स्वागत केलं आणि त्यांना बग्गीत घेतलं. तिने त्यांना ब्लँकेटनी झाकून त्यावर कांदा बटाट्याची पोती ठेवली. ती त्यांना घोड्याच्या तबेल्यात घेऊन गेली आणि अंधार होईपर्यंत तिने त्यांना तिथेच लपवून ठेवलं. नंतर पुन्हा बग्गीत बसवून मेरीलँडमधील एका विटांच्या घरात घेऊन गेली.



गोऱ्या बाईने दरवाजा ठोठावला. सगळे आत गेले तर काय! तिथे हॅरिएट त्यांची वाट बघत होती. होडी, बग्गी सगळ्याची व्यवस्था तिनेच केली होती.



आता हॅरिएट त्यांना उत्तरेकडे न्यायला सज्ज झाली. जॉन आणि मेरीने बघितलं, हॅरिएट आता पिस्तुल बाळगून होती. स्वकमाईतून तिने ते विकत घेतलं होतं. पिस्तुल आणि दलदलीतून चालण्याचा अनुभव याच्या जोरावर ती तिच्या बहिणीच्या कुटुंबाला भूमिगत रेल्वेच्या एका स्टेशनवरून दुसऱ्या स्टेशनकडे नेत राहिली. दिवसभर ते लपून बसायचे आणि रात्रभर प्रवास करायचे. कधी चालत, कधी बग्गीने तर कधी बोटीने ते पुढे पुढे जात रहिले. अखेर ते सुखरूपपणे फिलाडेल्फियाला पोचले. पहिल्यांदाच हॅरिएट भूमिगत रेल्वेवरील प्रवासी नव्हे तर कंडक्टर बनली होती. त्यानंतरही अनेक वेळेला तिने ही कामगिरी पार पाडली.

# प्रकरण ५

## कंडक्टर

हॅरिएटने पुन्हा दक्षिणेकडे जायचा बेत केला. तिच्या अनेक नातेवाईकांना तिच्या मदतीची गरज होती. १८५० नंतर हा प्रवास जास्त धोकादायक बनला. पळून गेलेल्या गुलामांसाठीचा कायदा संमत करण्यात आला होता. आता स्वतंत्र राज्यात पळून आलेल्या गुलामांना पुन्हा त्यांच्या मालकांकडे पाठवणं बंधनकारक करण्यात आलं. जर ते परतले नाही तर त्यांना मोठा दंड भरावा लागत असे किंवा तुरुंगात डांबलं जाई. पळून आलेल्या गुलामांना गोळ्या घातल्या जायच्या, चाबकाने फोडलं जायचं नाहीतर दक्षिणेत पुन्हा विक्री होऊन ते कामाने मरून जायचे.



आपली 'पार्सल्स' खात्रीपूर्वक सुखरूपपणे मुक्त व्हावीत यासाठी हॅरिएटला त्यांना अमेरिकेची सीमा ओलांडून कॅनडाला घेऊन जावं लागायचं. कॅनडाला गुलामी नव्हती. पण कॅनडातील अगदी जवळची शहरंसुद्धा फिलाडेल्फिया वा न्युयॉर्कच्या मानाने दक्षिणेकडून खूप जास्त दूर होती.




कॅनडापर्यंतचा प्रवास खूप लांबचा आणि अधिक खडतर असणार होता. त्यात पकडलं जाण्याची शक्यता खूप जास्त होती. पळणाऱ्या गुलामांना पकडणाऱ्यांना मोठं इनाम दिलं जाई त्यामुळे गुलामांना पकडण्यासाठी काही दांडगे लोक सारखे मागावर असायचे. तरीही हॅरिएटचा हा प्रवास करण्याचा इरादा पक्का होता.

१८५१ला हॅरिएट पुन्हा मेरीलँडला गेली. तिने आपला एक भाऊ आणि आणखी दोन पुरुषांना मुक्त करण्यात पुढाकार घेतला. तिकडे उत्तरेमध्ये तिने आणखी एका हॉटेलमध्ये काम करायला सुरुवात केली. मोठ्या कष्टाने ती पैसे कमावत आणि साठवत होती. ती पुन्हा दक्षिणेकडे जाणार होती. या वेळेस आपला नवरा जॉन टबमॅन याला इकडे आणायचं तिने ठरवलं होतं. ती आधी जिथे काम करायची त्या मळ्यात ती आली.

हॅरिएटने पुरुषांचा सूट घातला. आपल्या डोक्यावरील खुण लपवण्यासाठी तिने टोपीही घातली. पण जेव्हा ती आपल्या नवऱ्याच्या झोपडीत शिरली तेव्हा तिला धक्का बसला. जॉनने दुसरं लग्न केलं होतं. तो तिच्याबरोबर यायला तयार नव्हता.
हॅरिएट लगेच तिथून बाहेर पडली. तिने मुक्त होऊ बघणाऱ्या गुलामांचा एक गट तयार केला आणि त्यांना उत्तरेकडे घेऊन आली.



आधी ह्या गटांमध्ये तिच्या कुटुंबातील सदस्यही असत. मात्र पुढे पुढे ती संपूर्ण अनोळखी लोकांच्या गटाला मदत करायला जाऊ लागली.

हॅरिएटने एक नित्यक्रम बनवला. ती हिवाळ्यात कॅनडात सेंट कॅथेरिनमध्ये एक घर भाड्याने घ्यायची. पळून आलेल्या गुलामांबरोबर तिथे ती रहायची. तिथे लाकडं फोडून ते पैसे कमवायचे. वसंतात आणि उन्हाळ्यात ती केप मे, न्यू जर्सी किंवा फिलाडेल्फियाला जायची आणि तिथल्या हॉटेल्समध्ये कामं करून पैसे साठवायची. वर्षातून दोनदा म्हणजे वसंत आणि शिशिर ऋतूत ती दक्षिणेला जायची आणि आणखी आणखी गुलामांना कॅनडाला घेऊन यायची. कधी कधी ती गुलामांना स्वतःची सुटका कशी करू घ्यायची हे शिकवायची. ती धुळीत नकाशे काढायची, त्यावर ओळखीच्या खुणा दाखवायची, कुणाकडून आणि कुठे मदत मिळेल तेही सांगायची. आतापर्यंत हॅरिएटकडे भरपूर अनुभव गाठीशी होता. जरी ती एका मार्गाने पुन्हा परत कधीच गेली नसली तरी रस्त्यातील झरे, नद्या, दलदलीची ठिकाणं, खाच खळगे सगळ्यांशी तिची ओळख झाली होती. 'पॅसेंजर'ना आसरा मिळू शकेल अशी सगळी 'स्टेशनं' म्हणजेच क्वेकर लोकांची घरं तिला माहित झाली होती.

गुलामांच्या मागावर असलेल्यांना कसा चकवा द्यायचा ह्याच्या अनेक युक्त्या तिला माहित झाल्या होत्या. ती पुरुषांना बायकांचे आणि बायकांना पुरुषांचे कपडे घालायला लावायची. गुलामांची ठरवून शनिवारी सुटका करायची. रविवार सुट्टीचा दिवस, त्यामुळे गुलाम गायब झाले आहेत हेही बरेचदा सोमवारपर्यंत कळायचं नाही. सोमवारपर्यंत गुलामाच्या मालकांना शोध घेणाऱ्या संस्थांना संपर्क करणं, हरवलेल्या गुलामांची पोस्टर्स बनवणं अशी कामं करता यायची नाहीत. तोपर्यंत हॅरिएट आणि गुलाम बरेच लांब गेलेले असत.

हळूहळू लोक हॅरिएटबद्दल बोलू लागले. तिच्या अनेक आख्यायिका बनल्या होत्या - तिला काळोखात दिसतं, तिला हवेतूनच धोका जाणवतो, ती मोठ्या माणसालाही मैलोनमैल उचलून घेऊ जाऊ शकते अशा अनेक खऱ्याखोट्या गोष्टी लोक एकमेकांना सांगायचे. गुलामांच्या मालकांनासुद्धा हॅरिएटबद्दल बरंच काही कळलं होतं. त्यांनी तिला पकडणाऱ्याला मोठं इनाम देणारी पोस्टर्स जागोजागी लावली होती. एक वेळ अशी आली की तिच्यासाठी ४०,००० डॉलर्सचं बक्षीस लावलं गेलं.



हॅरिएटलाही तिचं वय, उंची, कपाळावरची खुण याचं वर्णन करणाऱ्या पोस्टर्सबद्दल कळलं होतं. पोस्टर्समध्ये तिला लिहिता/वाचता येत नाही असंही लिहिलं होतं. एकदा एका रेल्वेस्टेशनवर दोन लोकांना तिने तिच्याबद्दल बोलताना ऐकलं. पोस्टरमधली बाई तीच आहे की नाही याबद्दल त्यांची चर्चा चालू होती. हॅरिएटच्या हातात एक पुस्तक होतं.

हॅरिएटने पुस्तकात तोंड खुपसलं आणि ती वाचण्याचं नाटक करत राहिली. वाचत असल्यामुळे ती पोस्टरमधली बाई नाही अशी त्या दोघांची खात्री पटली. तिने त्यांना चकवलं होतं पण ती अगदी थोडक्यात वाचली होती. नशीब, तिने पुस्तक उलटं पकडलं नव्हतं!



तिच्या वडिलांना मालकाकडून खूप त्रास होतोय हे कुठूनतरी हॅरिएटला समजलं. अशा वेळी काय करायला हवं ते हॅरिएटला माहित आता होतं. दक्षिणेकडे जाऊन आई वडिलांना उत्तरेला घेऊन येणं हाच पर्याय होता. पण बेन आणि ओल्ड रिट इतर पॅसेंजरपेक्षा वेगळे होते. ते आता खूप म्हातारे आणि दुबळे झालेले होते. रात्रभर चालणं, नद्या पार करणं त्यांना आता शक्य नव्हतं. काहीतरी वेगळा पर्याय काढायला हवा होता.



१८५७ला हॅरिएट मेरीलॅंडमधील प्लॅंटेशनमध्ये पोचली. डॉली मे नावाची म्हातारी घोडी तिला मिळाली. घोडीला चुचकारत ती जंगलात घेऊन आली. जुन्या गाडीची चाकं, फळ्या, दोरी याच्या सहाय्यानं तिने एक ओबडधोबड मालगाडी बनवली. आता ती आई वडिलांना घेऊन यायला सज्ज झाली. या गाडीत बसवून त्यांना कॅनडापर्यंत घेऊन यायचं असं तिने ठरवलं.



निम्म्या अंतरापर्यंत हॅरिएट स्वतः त्यांना घेऊन आली. पण उघड्या गाडीतून प्रवास करणं तिच्यासाठी धोक्याचं होतं. म्हणून ती गाडीतून उतरून पायी चालत राहिली. सेंट कॅथेरीनला ती आई वडिलांना पुन्हा भेटली. आयुष्यात पहिल्यांदा ते स्वतंत्र झाले होते. तिने त्यांच्यासाठी न्यूयॉर्कमधील अबर्न येथे एक घर बघितलं. तिच्या कमाईतला काही भाग आता आई वडिलांच्या देखभालीसाठी खर्च होऊ लागला. ती आणखीन कामं करू लागली.



जास्त पैसे मिळवण्यासाठी कधीकधी ती गुलामगिरीविरोधी सभांमध्ये भाषण द्‌यायची. सुरुवातीला गर्दीसमोर बोलताना तिला खूप भीती आणि लाज वाटायची. पण गोष्टी रंगवून सांगायला तिला खूप आवडायचं. तिच्या साहसी सुटकांचे किस्से ऐकायला लोकांनाही खूप आवडायचं. लवकरच ती उत्कृष्ट व्याख्यानं देऊ लागली. भाषणं द्‌यायला ती वेगवेगळ्या शहरात जाऊ लागली.

१८६०ला भाषण देण्यासाठी बोस्टनला जाताना न्यूयॉर्कमधील ट्रॉय येथे आपल्या नातेवाईकांना भेटायला ती गेली. तिथे एक वेगळंच संकट तिच्यासमोर उभं राहिलं. चार्ल्स नेल नावाच्या पूर्वीच्या गुलामाला गुलामांना पकडणाऱ्या संस्थेने पकडलं होतं. नेल कोर्टात आपल्या खटल्याच्या सुनावणीची वाट बघत होता. कोर्टात अनेक लोक होते. काही गुलामगिरीच्या बाजूचे तर काही गुलामगिरीच्याविरोधातले.



नेलला आपल्या मालकाकडे परत जावं लागेल असा निर्णय न्यायाधीशांनी दिला आणि मोठा गहजब झाला. लोकं पेटून उठली, दंगा भडकला आणि हॅरिएट त्यात सामील झाली. स्वतःच्या प्राणाची बाजी लावत तिने नेलला मदत केली. जखमा थोड्या भरून आल्याबरोबर ती बोस्टनला भाषण देण्यासाठी पोचली.

हॅरिएटने त्या वर्षाच्या शेवटी दक्षिणेतील आपली शेवटची यात्रा केली. दोन लहान मुलं असलेल्या एका कुटुंबाला ती उत्तरेला घेऊन आली. गुलामीविरुद्ध लढणाऱ्या तिच्या मित्रमंडळीनी त्यानंतर मात्र दक्षिणेला जायची तिला सक्त मनाई केली.



आता ती 'भूमिगत रेल्वेवरील' कंडक्टर बनू शकत नव्हती. गुलामांचे मालक तिला ठार मारायला टपले होते. हॅरिएटचं आयुष्य अतिशय मोलाचं होतं. स्वातंत्र्याचं काम सुरु ठेवण्यासाठी तिला आता वेगळा मार्ग शोधावा लागणार होता.

# प्रकरण ६

## नागरी युद्ध

१८६१मध्ये उत्तर आणि दक्षिणी राज्यांमध्ये अंतर्गत युद्ध सुरु झालं. युद्धाची कारणं अनेक होती. गुलामी हे त्यातील एक कारण होतं. दक्षिणेतील लोकांना गुलाम हवे होते. उत्तरेतील लोक संपूर्ण अमेरिकेतून गुलामीचं उच्चाटन व्हावं ह्या मताचे होते. म्हणून दक्षिणेकडच्या राज्यांनी उत्तरेपासून वेगळं व्हायचा निर्णय घेतला. अकरा दक्षिणी राज्यांनी त्यांचं वेगळं सैन्य तयार केलं. ते स्वतःला 'कॉन्फेडरेट स्टेट्स ऑफ अमेरिका' म्हणू लागले. दक्षिणेने वेगळं होऊ नये असं उत्तरेला वाटत होतं. अमेरिकेतील उत्तरेकडील राज्यं स्वतःला युनियन म्हणत असत. दक्षिणेकडच्या राज्यांनी पुन्हा युनियनशी जोडलं जावं यासाठी त्यांनी युद्ध छेडलं. मॅसॅच्युसेट्सचे राज्यपाल जॉन अँड्र्यू यांनी हॅरिएटला युनियनच्या सैन्यासाठी काम करायची विनंती केली. अँड्र्यूनी तिची भाषणं ऐकली होती. तिच्या गुलामीतल्या आयुष्याविषयी, तिच्या "भूमिगत रेल्वे" मधल्या कामगिरीविषयी त्यांना माहिती होती.

कॉन्फेडरेटचा झेंडा



युनियनचा झेंडा



त्यामुळे उत्तरेच्या लढ्याला ती मदत करू शकते असं त्यांना वाटलं.

हॅरिएटला स्वातंत्र्यासाठी लढायला नवीन मार्ग मोकळा झाला. तिनं होय म्हटलं. सगळ्यात आधी तिने दक्षिण कॅरोलिनाच्या किनाऱ्यावरील रॉयल आयलंड बेटाला भेट दिली. हजारो उत्तरी राज्यांचे सैनिक तिथे लढाईच्या आदेशाची वाट बघत एकवटले होते.




हजारो पळून आलेले गुलामही तिथे जमले होते. कायद्यानुसार गुलाम अजून स्वतंत्र झाले नव्हते, पण तरीही त्यांना युनियनच्या सैन्यात सहभागी व्हायचं होतं. त्यांच्या स्वातंत्र्यासाठीच्या या लढाईत त्यांनाही आपलं योगदान द्यायचं होतं.

पण त्यात अनेक आव्हानं होती. गुलामांचे आचार, विचार अजून गुलामांसारखेच होते. गोऱ्या सैनिकांनी हुकूम



द्यायचे आणि आपण ते पाळायचे अशीच त्यांची मनोवृत्ती होती. स्वतंत्र माणसासारखा विचार करण्याची त्यांना सवय नव्हती. तिथे हॅरिएटने गुलामांना स्वतंत्र माणसांसारखा विचार करायला शिकवलं. त्याचबरोबर गोऱ्या सैनिकांनाही गुलामांबरोबर मिळून काम करायला शिकवलं.

हॅरिएटने काळ्या स्त्रियांनाही मदत केली. विकता येतील अशा वस्तू बनवायला तिने त्यांना शिकवलं. दक्षिणेतील गुलामांसारखी ढोरमेहनत न करता उत्तरेतील मुक्त लोकांसारखं जीवन जगता यावं म्हणून तिने त्यांना सर्वतोपरी मदत केली.

रॉयल आयलंड बेटावरील अनेक गुलाम आजारी किंवा जखमी होते. त्यातील बऱ्याचशा जखमा त्यांच्या मालकांनी ते पळून जाऊ नयेत यासाठी केलेल्या मारहाणीमुळे झालेल्या असत. त्यांच्यासाठी बेटावर एक इस्पितळ उभारलं होतं.

हॅरिएट तिथे नर्स बनली. तिने जखमा साफ केल्या. तापाने फणफणलेल्या रोग्यांच्या कपाळावर तिने थंड पाण्याच्या पट्ट्या ठेवल्या. जखमी गुलामांच्या आजूबाजूस दिवसभर





माशा घोंघावत रहायच्या. हॅरिएट त्यांना हाकलवत रहायची.

काही रुग्णांना जुलाब होत होते. जुलाबामुळे त्यांची आतडी पिळवटून जात. त्यातले बरेच रुग्ण दगावत. कंदमुळं आणि औषधी वनस्पती यांच्यापासून तिची आई काढे बनवायची हे तिला आठवलं. काढ्याचा उपयोग होईल का? तिने प्रयत्न करून बघायचं ठरवलं. ती जंगलात फिरली, कमळं शोधली आणि





दलदलीतून कमळांचे कांदे उपटून काढले. तिने क्रेनबिलची फुलं गोळा केली. आणि ह्या सगळ्या वनस्पती खूप उकळवून त्याचा दाट काढा तयार केला. त्यातला थोडा काढा हॅरिएटने जुलाबामुळे मरायला टेकलेल्या एका माणसाला पाजला. थोड्याच दिवसात त्याची तब्बेत सुधारू लागली. लोकांना हा हॅरिएटचा आणखी एक चमत्कार वाटला. हॅरिएट जर आपल्याजवळ असेल तर आपण मरणार नाही असा विश्वास आजारी माणसांना वाटू लागला.

१८६२ च्या पुढेही युद्ध चालूच राहिलं. एका क्षणी तर दक्षिणी राज्यं युद्ध जिंकतील असं वाटू लागलं होतं. उत्तरेकडचे आणि दक्षिणेकडचे लाखो सैनिक मरण पावले होते आणि त्याहून कितीतरी जखमी झाले होते. तरीही कुणी माघार घ्यायला तयार नव्हतं. रक्ताचे पाट वाहतच राहिले.

१८६३ मध्ये राष्ट्रपती अब्राहम लिंकन यांनी मुक्तीची उद्घोषणा केली ज्यामुळे दक्षिणेकडील सर्व गुलाम स्वतंत्र झाले. आता दक्षिणेतला काळा माणूस उत्तरेच्या सैन्यात सामील होऊ शकत होता. त्यांनी स्वतःची 'ऑल ब्लॅक रेजिमेंट' स्थापन केली. त्यांना पूर्वीपासून युनियनला मदत करायची होती आणि आता ते शक्य होतं.



**अब्राहम लिंकन**

तरीही युद्ध थांबलं नाही.

ब्लॅक रेजिमेंटमध्ये हॅरिएटला नवीन काम देण्यात आलं. कर्नल जेम्स मॉन्टगोमरी यांनी तिला त्यांच्या या काळ्या सैन्यदलासाठी टेहळणी करायला म्हणजेच



**कर्नल जेम्स मॉन्टगोमरी**

गुप्तहेर बनायला सांगितलं. ठेंगणी, काळी, अगदीच निरुपद्रवी वाटणारी हॅरिएट या कामासाठी अगदी योग्य व्यक्ती होती. शत्रूच्या सैन्यामागे लपत छपत जाऊन ती गोऱ्या मालकांबरोबर असलेल्या काळ्यांना भेटत असे. ते काळे तिच्यावर विश्वास ठेवत. दक्षिणी राज्यांच्या सैन्याची माहिती ते तिला देत. युनियनच्या सैन्याला या माहितीचा खूप उपयोग होई.

हॅरिएट युनियनच्या सैन्यविभागाची दक्षिण प्रभागाच्या गुप्तहेर खात्याची कमांडर बनली. तिच्या हाताखाली नऊ गुप्तहेर होते.



हॅरिएट दक्षिण कॅरोलिना ते फ्लोरिडा या क्षेत्रातील गुप्तहेर खात्याची प्रमुख होती. तिच्या हाताखाली काम करणाऱ्या गोऱ्यांना आधी काळ्या स्त्रीच्या आज्ञा ऐकायची सवय नव्हती. पण नंतर मात्र ते तिचा आदर आणि प्रशंसा करू लागले.

गुप्तहेरीचं काम धोक्याचं होतं. पण हॅरिएटसाठी जीव धोक्यात घालून काम करणं सवयीचं झालं होतं. तिने आपल्या नदीच्या बाबतीतला अनुभवांचा वापर चढाईचं नेतृत्व करताना मोठ्या खुबीने केला. २ जून १८६३ रोजी जनरल मॉन्टगोमरी, हॅरिएट आणि साधारण तीनशे काळे सैनिक दक्षिण कॅरोलिनामधील कुंबई नदीच्या किनारी उभे ठाकले. नदीच्या किनाऱ्याजवळून जाणारे रेल्वे रूळ उखडायचं असं त्यांनी ठरवलं होतं.





नदीवरचे पूल उडवण्याचाही त्यांचा बेत होता. पूल आणि रेल्वेरूळ उखडले गेले तर दक्षिणी छावणींना शिबंदी मिळू शकणार नव्हती. पुरेसं अन्न, बंदुका आणि प्रथमोपचाराच्या साहित्य मिळाल्याशिवाय युद्ध जिंकणं दक्षिणेला शक्य झालं नसतं.

अंधाऱ्या रात्री हॅरिएट आणि साथीदार बोटीने एका वळणापर्यंत आले. हॅरिएटने कप्तानाला बोट थांबवायला सांगितली. दक्षिणी सैनिकांची छावणी तिथून अगदी जवळच होती.

हॅरिएटचे सैनिक बोटीतून हळूच उतरले आणि त्यांनी छावणीला घेराव घातला. बंदुकीची एकही गोळी न झाडता त्यांनी दक्षिणी सैनिकांना बंदी बनवलं. उत्तरेच्या आणखी लढाऊ बोटी नदीत आल्या. दक्षिणी सैनिकांना त्या आपल्या बोटी वाटल्याने त्यांनी त्यांना मदतीला बोलावलं. हॅरिएटचे सैनिक चपळ होते. त्यांनी दक्षिणी सैनिकांच्या अन्न आणि कापसाच्या गोदामांना आगी लावल्या.

त्यांनी शेतमळ्यांना आणि मोठमोठ्या घरांनाही आगी लावल्या. अनेक गुलाम अजून तिथे काम करत होते. काळ्या सैनिकांना पाहून तेही उत्साहाने त्यांच्यात सामील झाले.

उत्तरेच्या लढाऊ बोटी आता परत फिरल्या. आक्रमणाचा हेतू सफल झाला होता. युनियनने लढाई जिंकली होती आणि सातशे छप्पन गुलाम युनियनच्या सैन्यात सामील झाले. युनियनच्या बाजूने असलेल्यांची संख्या वाढत असल्यामुळे युनियनला युद्ध जिंकण्याची मोठी संधी मिळाली.

शत्रूच्या प्रदेशात चढाई करताना हॅरिएट युनियनच्या सैन्याचं नेतृत्व करत राहिली. तिच्याजवळ सतत तिचं पिस्तुल असायचं आणि ते वापरायला ती घाबरत नव्हती. पण ती अजूनही पायघोळ स्कर्ट वापरत होती. त्याची अडचण होत असूनही ती आता पूर्वीसारखे सहजपणे पुरुषांचे कपडे घालू शकत नव्हती.

# कुंबई नदीवर आक्रमण





स्त्रियांनी पुरुषांचे कपडे घालणं योग्य समजलं जात नव्हतं. त्यांना लांब स्कर्ट आणि त्याच्या आत अनेक पेटीकोट घालावे लागायचे. किती हा त्रास! इतक्यात हॅरिएटने ॲमेलिया ब्लूमरबद्दल ऐकलं. ॲमेलिया ब्लूमरने स्त्रियांसाठी सुटसुटीत पोशाख डिझाईन केला होता.

त्या पोशाखात एक छोटं जाकीट, छोटा स्कर्ट आणि एक लांब पॅंट होती. हॅरिएटला अगदी असाच पोशाख हवा होता. एके ठिकाणी ती म्हणाली देखील, "आता यापुढे मोहिमेवर जाताना मी कधीच पायघोळ कपडे वापरणार नाही. लवकरात लवकर मी ॲमेलियासारखे कपडे वापरायला लागेन."



हॅरिएटने दोन वर्षं हेरगिरी केली. १८६४ पर्यन्त ती थकून गेली होती. तिला घरी परतून आराम करावा अस वाटू लागलं. तिला आपल्या आई वडिलांनाही भेटायचं होतं.

## फ्रेडरिक डग्लस

*फ्रेडरिक डग्लस हा खर्डा वक्ता आणि ॲबॉलिशनिस्ट चळवळीचा महत्वाचा नेता होता. मेरीलँडमध्ये १८१७ च्या सुमारास एक गुलाम म्हणून त्याचा जन्म झाला. लहान असतानाच गुप्तपणे तो स्वतःच लिहायला, वाचायला शिकला होता. ही फारच भयंकर गोष्ट होती. जर कुणी त्याला शिकताना पकडलं असतं तर त्याला फाशीही होऊ शकली असती. गुलामीतून सुटका झाल्यावर त्याने आपल्या आयुष्यावर व्याख्यानं द्यायला सुरुवात केली. तो अभ्यासू आणि विद्वान वक्ता होता. लोकं लांबून लांबून त्याचं भाषण ऐकायला येत. १८४५ मध्ये त्याने 'नरेटिव्ह ऑफ लाईफ ऑफ फ्रेडरिक डग्लस' नावाचं पुस्तक लिहिलं. त्यात त्याने गुलामांना भोगाव्या लागणाऱ्या मारहाणी, क्रौर्य आणि यातनांविषयी लिहिलं.*

*त्यात त्याने आपल्या मालकाविषयी लिहिलं असल्यामुळे त्याला इंग्लंडला पळून जावं लागलं. तिथल्या सहानुभूतीदारांनी पैसे भरून त्याला गुलामीतून मुक्त केलं. अमेरिकेत परत आल्यावर त्याने 'द नॉर्थ स्टार' नावाचा गुलामीविरुद्धचा शोधनिबंध प्रकाशित केला. नागरी युद्धावेळी तो राष्ट्रपती अब्राहम लिंकन यांचा सल्लागार होता. युनियनच्या सैन्यात काळ्या सैनिकांची भरती करणे आणि नव्याने मुक्त झालेल्या गुलामांना मतदानाचा अधिकार मिळणे यासारख्या विषयात त्याने मोलाची कामगिरी बजावली.*

*डग्लसने 'माय बाँडेज अँड माय फ्रिडम(१८५५) आणि 'लाईफ अँड टाईम्स ऑफ फ्रेडरिक डग्लस(१८८१)' नावाची आणखी दोन पुस्तके प्रकाशित केली. त्याने अनेक सरकारी पदांवर तसेच मंत्री म्हणूनही काम केले. वॉशिंग्टन येथे १८९५ साली त्याचे निधन झाले.*



हॅरिएटने केलेल्या कामाच्या बदल्यात सरकार अजूनही तिला अठराशे डॉलर्स देणं बाकी होती. काळ्यांचे नेते, वक्ते आणि मंत्री असलेले फ्रेडरिक डग्लस आणि इतर अनेक महत्वाच्या मित्र मंडळींनी सरकारला वारंवार लिहूनही हे पैसे हॅरिएटला कधीच मिळाले नाहीत.



आई वडिल सुस्थितीत असल्याची खात्री पटल्यावर आणि पुरेशी विश्रांती मिळाल्यावर हॅरिएट पुन्हा कामावर परतली. ती वॉशिंग्टन डी. सी. मधील फोर्ट्रेस मॉन्रो हॉस्पिटलात काम करू लागली. तिथे तिने काळ्या रुग्णांची मनापासून देखभाल केली.

# घटनात्मक दुरुस्त्या

*सतराव्या शतकाच्या पहिल्या दशकात संविधान लिहिणाऱ्यांना येणाऱ्या भविष्यात हा देश बदलेल, त्यावेळच्या सरकारांना ह्या बदलांना सामोरे नवीन मार्ग शोधावे लागतील याची कल्पना होती. त्यासाठीच संविधानात दुरुस्त्या करण्याचा मार्ग त्यांनी योजून ठेवला होता. कायदे बनवणाऱ्यांना सहमतीने महत्वाचे नवीन कायद्यांची भर घालता येणं शक्य होतं.*

*सतराव्या शतकाच्या पहिल्या दशकापासून कॉँग्रेसने संविधानात वेळोवेळी अनेक दुरुस्त्या केल्या होत्या. अमेरिकेतील लोकांच्या त्या त्या वेळच्या गरजा आणि दृष्टीकोनांचे दर्शन ह्या दुरुस्त्यांतून होते. नागरी युद्धानंतर तेरावी, चौदावी आणि पंधरावी दुरुस्ती करण्यात आली. ह्या दुरुस्त्यांनी गुलामी संपुष्टात आणली आणि कुठल्याही रंगाच्या आणि वंशाच्या लोकांना नागरिकत्वाच्या अधिकाराची हमी दिली गेली.*



**अब्राहम लिंकन**

लवकरच हेडनर्स म्हणून हॅरिएटची पदोन्नती करण्यात आली. एप्रिल १८६५ मध्ये नागरी युद्ध थांबलं. युनियनच्या सैन्यानं युद्ध जिंकलं. यापुढे अमेरिका कॉन्फेडरेट स्टेट्स नव्हे तर पूर्वीसारखाच एकसंघ देश असणार होता.

अखेरीस डिसेंबर १८६५ मध्ये अमेरिकेतून गुलामीचं उच्चाटन करण्यात आलं. अनेकजणं वाट पाहत असलेल्या या क्षणाची ती केवळ एक साक्षीदार नव्हती, हा क्षण प्रत्यक्षात आणण्यासाठी तिचंही महत्त्वाचं योगदान होतं.

## प्रकरण ७
## आपल्या माणसांची मोझेस

हॅरिएट तिच्या अबर्न, न्यूयॉर्कच्या घरी परतली. तिचे आई वडील म्हातारे झाले होते. त्यांना तिची गरज होती. पूर्वी गुलाम असलेल्यांनाही तिची मदत हवी होती. काळे मुक्त झाले असले तरी त्यांच्या अडचणी संपल्या नव्हत्या. त्यांना अजूनही गोऱ्या अमेरिकनांएवढे अधिकार नव्हते.






उदाहरणार्थ गोऱ्यांच्या शेजारी राहणं, गोऱ्यांच्या दुकानातून काही खरेदी करणं, गोऱ्यांच्या चर्चमध्ये प्रार्थना करणं काळ्यांना शक्य नव्हतं. काळी मुलं गोऱ्या मुलांच्या शाळेत जाऊ शकत नव्हती. त्यांना काळ्यांच्या शाळेतच जावं लागे. अनेक गोरे लोक काळ्यांना नोकरीवर ठेवत नसत. नुकतेच गुलामीतून मुक्त झालेले लोक गरीब आणि आजारी होते. त्यांच्याजवळ उपजीविकेचं कोणतंही साधन नव्हतं. हॅरिएटने सगळ्यांना मदत केली. कुणालाही कधी नाही म्हटलं नाही.

या सगळ्यांची काळजी घ्यायला हॅरिएटला पैशाची मोठी गरज होती. हे पैसे ती कशी मिळवणार होती?

सारा ब्राडफोर्ड नावाची गोरी स्त्री तिच्या मदतीला पुढे आली. ती अबर्न येथे हॅरिएटला येऊन भेटली. हॅरिएटने तिला गुलामीच्या आणि गुलामांच्या सुटकेच्या अनेक गोष्टी सांगितल्या.



हॅरिएट लिहायला वाचायला शिकली नसली तरी कुशाग्र बुद्धीची होती. अगदी बारीकसारीक गोष्टीही तिच्या लक्षात होत्या. बायबलमधील अनेक उतारे पाठ असल्यामुळे या गोष्टी ती अतिशय रंजकपणे आणि नाट्यमय रीतीने सांगत असे. भूमिगत रेल्वेवरील तिचे अनेक प्रवास, युद्ध, नर्स म्हणून केलेलं काम, गुप्तहेरी... तिच्याकडे गोष्टींचा न संपणारा खजिना होता.




१८६९ मध्ये सारा ब्राडफोर्डने ‘सीन्स इन द लाईफ ऑफ हॅरिएट टबमॅन’ या नावाचं हॅरिएटचं चरित्र प्रसिद्ध केलं. त्यातून मिळालेली सारी कमाई हॅरिएटला मिळणार होती.

त्याच वर्षी हॅरिएटने नेल्सन डेविसशी लग्न केलं. युनियनच्या बाजूने लढताना एका काळ्यांच्या सैन्यदलात त्यांची पहिली भेट झाली होती. नेल्सन रुबाबदार आणि हॅरिएटपेक्षा वीस वर्षांनी लहान होता. पण तो क्षयरोग या फुफ्फुसाच्या रोगाने आजारी होता. त्याला सेवा शुश्रूषेची गरज होती.



१८६७ मध्ये हॅरिएटचा पहिला नवरा जॉन टबमॅनची मेरीलँड येथे हत्या करण्यात आली होती. त्याच्याबरोबर खऱ्या अर्थाने तिला कधीच संसार करता आला नव्हता. नेल्सनमुळे तिला ती संधी मिळाली. तब्येत सुधारल्यावर त्याने गवंडीकाम करायला सुरुवात केली. कमावलेले पैसे हॅरिएटच्या समाजकार्यासाठी दिले.

हॅरिएटकडे सांगण्यासारख्या खूप गोष्टी होत्या. समाजकार्यासाठी तिला सतत आणखी पैसे हवेच असत.

म्हणून सारा ब्राडफोर्डने ‘हॅरिएट टबमॅन – द मोझेस ऑफ हर पिपल’ नावाचं दुसरं पुस्तक लिहिलं. ते १८८६ मध्ये प्रकाशित झालं. त्यातून आणखी पैसे मिळाले खरे पण तिने सुरु केलेल्या कामासाठी ते अपुरेच होते.




१८८८ मध्ये नेल्सन डेविस वारला. त्याच्या काही वर्षे आधी हॅरिएटचे आई वडीलही वारले होते.



आता हॅरिएट पुन्हा एकाकी झाली. पण तरीही नेटाने ती काम करत राहिली. ती अनेक गरीब, म्हाताऱ्या, आजारी काळ्या लोकांची आपल्या घरात सेवा करत होतीच. पण त्याहूनही जास्त माणसांची सेवा करायला तिला जास्त मोठ्या घराची आणि जमिनीची गरज होती. ती करत असलेलं समाजकार्य तिला पुरेसं वाटत नव्हतं. प्रत्येक गरजू काळ्या स्त्री पुरुषांना सामावून घेऊ शकेल एवढं मोठं हॉस्पिटल आणि विश्रांतीगृह बांधायचं स्वप्न ती बघत होती.

हॅरिएटने आपल्या मालकीच्या जमिनीवर भाज्या पिकवायला आणि त्या दारोदारी जाऊन विकून पैसे कमवायला सुरुवात केली. कुठल्याही घरासमोर ती थांबली की तिला हमखास आत बोलावलं जाई. कधीकधी तिच्या आवडीच्या लोणी घातलेल्या चहाचा पाहुणचारही होई. खुर्चीवर बसून चहाचे घोट घेत घेत ती गत आयुष्यातील घटनांचा गोफ विणू लागे. नागरी युद्धाचे वर्णन करताना ती म्हणे, "आम्ही अचानक विजेचा लोळ बघितला, कडकडाट ऐकला, त्या बंदुकांच्या फैरी झडत होत्या. मग पाऊस कोसळू लागला, तो पाऊस नाही, रक्ताचे थेंब होते. आम्ही कापणी करायला शेतात शिरलो, तर पिकाऐवजी हातात मेलेल्या माणसाचं शरीर आलं..."

कधी ती १८६५ साली राष्ट्रपती लिंकन यांच्या जॉन विल्केस बूथ याने केलेल्या हत्येविषयी बोलत असे.
ह्या हत्येविषयी प्रतिक्रिया देताना एक म्हातारा माणूस काय बोलला होता ते आत्ताही तिला आठवत असे. "जमिनीवर गुडघे टेकून, चेहरा हाताने झाकून, मातीवर पडून आम्ही आक्रोश करतोय, परमेश्वरा हे आम्हाला काय पाहायला लावतोस!" कधीकधी ती आणखी मागे मागे जात असे. लहानपणी तिने ऐकलेल्या गोष्टी, गुलामांना कोंबून आफ्रिकेहून अमेरिकेला आणणारी जहाजं, त्यांच्यावर केले जाणारे अमानुष अत्याचार, चाबूक, साखळ्या याच्या कहाण्या सांगत असे.
भाषणं देऊनही हॅरिएटने पैसे कमावले. एकदा तिला स्त्रियांच्या हक्कांसाठी काम करणाऱ्या विख्यात सामाजिक कार्यकर्त्या सुझान बी. अँथनी आणि एलिझाबेथ कॅडी स्टँटन यांच्यासोबत व्यासपीठावरून भाषण करायची संधी मिळाली.
त्या दोघींनी अनेक वर्ष एकत्र काम केलं. स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीच्या आहेत हे सिद्ध करण्याची त्यांची धडपड होती. मतदानाचा अधिकार आणि इतर अनेक हक्क स्त्रियांना मिळावेत यासाठी त्यांनी अहोरात्र मेहनत घेतली.

## एलिझाबेथ कॅडी स्टँटन आणि सुझान बी. अँथनी

*१८४८ला सेनेका फॉल्स, न्यूयॉर्क येथे झालेल्या पहिल्या स्त्री अधिकार परिषदेत एलिझाबेथ कॅडी स्टँटन आणि सुझान बी. अँथनी एकमेकींना भेटल्या. लवकरच त्या घट्ट मैत्रिणी आणि साथीदार बनल्या. स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीने अधिकार मिळायला हवेत ह्यावर दोघींचे एकमत होतं. त्यांनी ग्रंथ आणि लेख लिहून, भाषणं देऊन समानतेचा विचार पसरवण्याचं काम केलं. सारख्या कामासाठी स्त्रियांना पुरुषांइतका मोबदला मिळायला हवा, त्यांना मालमत्तेचा अधिकार असावा असं त्यांचं मत होतं. स्त्रियांना मतदानाचा अधिकार मिळावा अशी त्यांची इच्छा होती. त्यांच्या मृत्युनंतर अनेक वर्षांनी म्हणजे १९२० साली अमेरिकेतील स्त्रिया मतदान करू शकल्या.*



सुझान अँथनी

एलिझाबेथ कॅडी स्टँटन

स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीच्या असतात ह्याचं हॅरिएट उत्तम उदाहरण होती. पुरुष करू शकतील त्याहीपेक्षा जास्त गोष्टी तिने करून दाखवल्या होत्या. प्रेक्षकांसमोर आत्मविश्वासाने उभी राहून ती म्हणाली, “मी भूमिगत रेल्वेची आठ वर्षे कंडक्टर होते. आणि माझ्याकडे इतर कंडक्टरपेक्षा जास्त किस्से सांगायला आहेत. माझी ट्रेन एकदाही रुळावरून घसरली नाही आणि मी एकाही पॅसेंजरला गमावलं नाही.”



आपल्या घराच्या आजूबाजूची जागा विकायला काढली आहे हे हॅरिएटला समजलं. हॅरिएटसाठी ही मोठी संधी होती. तिच्याकडे पुरेसे पैसे नव्हते, पण बँकेने तिला कर्ज दिलं. आता ती तिचं स्वप्न पुरं करू शकणार होती. ती सांभाळत असलेल्या लोकांना तिने नवीन जागेतील घरात हलवलं.

हळूहळू अनेक ठिकाणांहून माणसं येऊ लागली. त्यांनी हॅरिएटच्या आयुष्याविषयी वाचलं होतं आणि त्यांना हॅरिएटला भेटायचं होतं. तिला भेटायला येणाऱ्यांमध्ये अनेक खास माणसंही होती. लोकांनी तिला पत्रं लिहिली. तिला इंग्लंडच्या व्हिक्टोरिया राणीकडून मानपत्र, मेडल आणि काळी रेशमी शाल देण्यात आली.

तरीही हॅरिएटला नेहमी पैशाची चणचण भासत रहायची. १९०३मध्ये तिने आपलं राहतं घर आफ्रिकन मेथडिस्ट एपिस्कोपल झिओनिस्ट चर्चच्या हवाली केलं. ती त्या घरात राहू शकणार होती पण बिलं चर्च भरणार होतं. हॅरिएटने तिच्या आश्रयाला येणाऱ्या माणसांकडे कधीच पैसे मागितले नव्हते. त्यामुळे चर्चने केलेले काही बदल तिला अजिबात पटले नाहीत.

ती म्हणाली, “मी घर चर्चच्या हवाली केलं खरं, पण कळत नाही त्यांनी हे काय चालवलंय!”

शंभर डॉलर्स असल्याशिवाय कुणी घरात येऊ शकणार नाही असा नियम त्यांनी का बरं बनवला? खरंतर ज्यांच्याकडे पैसे आहेत ते या घरात येऊ शकणार नाही असा नियम मला बनवायचाय. आश्रयाला येणाऱ्या माणसाकडे पैसे मागणाऱ्या घराचा काय उपयोग?”

हॅरिएट आता म्हातारी झाली होती. तरीही तिला शहरातून फेरफटका मारायला आवडायचं. म्हातारपणामुळे जेव्हा तिला चालणं अशक्य झालं तेव्हा तिची भाचे नातवंडं तिला व्हीलचेअरवर बसवून फिरवून आणायची. वयाच्या ९२व्या वर्षी ती कुणाला भेटायला बाहेर जाऊ शकत नसे, पण तिला भेटायला येणाऱ्यांची वर्दळ अखंड चालू असायची.



तिला स्वतःला वाचता येत नसलं तरी ती आवर्जून कुणाकडून तरी वर्तमानपत्र वाचून घेई.



१९१३च्या वसंतात तिला न्युमोनिया झाला. आपण यातून आता बरे होणार नाही हे तिला कळून चुकलं. तिचा एक भाऊ आणि अगदी जवळचे मित्र आजूबाजूस असताना तिने प्राण सोडले.

अबर्न शहराने तिला सलामी दिली. अबर्नच्या भव्य सभागृहात लोकं जमली. अमेरिकेचा झेंडा अर्ध्यावर उतरवण्यात आला. अनेक वक्त्यांनी तिने आयुष्यभर केलेल्या कामाची स्तुती करून तिला आदरांजली वहिली. तिच्या स्मृतीप्रित्यर्थ अबर्नच्या न्यायालयाच्या प्रवेशद्वारावर एक ताम्रफलक लावण्यात आला.



त्यावर लिहिलं होतं : "दुर्दम्य साहसाच्या बळावर तिने तीनशे निग्रो गुलामांना मुक्ती मिळवून दिली."

धैर्य, ताकद आणि सगळ्यात महत्वाचं म्हणजे आपल्या समाजबांधवांना स्वातंत्र्य मिळवून देण्यासाठीची दुर्दम्य इच्छाशक्ती यासाठी हॅरिएट नेहमी सर्वांना प्रेरणा देत राहील.




**समाप्त**

# कोण होती हॅरिएट टबमॅन?

- इतर गुलामांना स्वातंत्र्य मिळवून देण्यासाठी आपले आयुष्य पणाला लावणारी पूर्व गुलाम
- नागरी युद्धाच्या दरम्यान जखमी सैनिकांचे प्राण वाचवणारी नर्स
- नागरी युद्धात युनियनच्या सैन्यासाठी मोलाची कामगिरी बजावणारी गुप्तहेर

या मनोरंजक आणि चित्तथरारक अल्पचरित्रातून तुम्हाला हॅरिएट टबमॅनचे अनेक पैलू समजतील.